जळगांव जिल्ह्यातील रावेर तालुक्यातील ७ इतर जिल्हा मार्ग व ३ ग्रामीण मार्ग रस्त्यांची प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नती करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०१८/प्र.क्र.१३७/नियोजन-२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- ०३ ऑक्टोबर, २०१८

**पहावे** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचे पत्र क्र.का-५/साबांप्राविना/प्रआ/रस्ते दर्जोन्नत/रावेर तालुका/२३६८/२०१८ दि. १४/०५/२०१८.
२) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, जळगांव यांचे पत्र क्र.साबांमंज/रेशा/प्रआ/३४४०/ सन-२०१८ दि. २७/०८/२०१८.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांनी संदर्भाधिन पत्रांन्वये जळगांव जिल्ह्यातील रावेत तालुक्यातील ७ इतर जिल्हा मार्ग व ३ ग्रामीण मार्ग रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच जिल्हा परिषद, जळगांव यांनी सदर रस्ते दर्जोन्नत करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्त्यांवरील वाहतुक वर्दळ व गावांची संख्या, लोकसंख्या, रस्त्यांचा होणारा वापर तसेच जिल्हा परिषद, जळगांव यांचा ठराव विचारात घेता सदर रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, जळगांव यांचा ठराव विचारात घेऊन जळगांव जिल्ह्यातील रावेर तालुक्यातील खालील रस्ते दर्जोन्नत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | समाविष्ठ रस्त्यांचा क्रमांक | साखळी क्रमांक व लांबी | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | राज्यमार्ग-४५ कोचुर -चिनावल - उंटखेडा - मुंजलवाडी - रसलपूर - केहाळे - भोकरी - तामसवाडी - खिरवड - नेहते - दोधे - अटवाडे - खानापूर - निरूळ - पाडळे ते राज्यसीमा रस्ता. | ग्रामीण मार्ग २० | (०/०० ते ४/५०) ४.५०० कि.मी. | ५२.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-७० |
| | | इतर जिल्हा मार्ग १५ | (०/००ते ४७/५०) ४७.५०० कि.मी. | | |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २. | के-हाळे - पिंप्री - अहिरवाडी - कर्जोत - वाघोद - मोरगांव - नेहते रस्ता. | इतर जिल्हा मार्ग-१७ | (०/०० ते १६/००) १६.०० कि.मी. | १६.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-७१ |
| ३. | खिरोदा - फैजपूर - रोझोदा - चिनावल- विवरा - उटखेडा - कुसुंबा ते प्रमुख जिल्हा मार्ग-१ रस्ता. | ग्रामीण मार्ग २६ | (०/०० ते ५/००) ५.०० कि.मी. | २७.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-७२ |
| | | ग्रामीण मार्ग ६९ | (०/०० ते ४/००) ४.०० कि.मी. | | |
| | | इतर जिल्हा मार्ग १५ | (०/००ते ३/३०) ३.३०० कि.मी. | | |
| | | इतर जिल्हा मार्ग २१ | (०/०० ते ६/००) ६.०० कि.मी. | | |
| | | इतर जिल्हा मार्ग १६ | (०/०० ते ८/७०) ८.७०० कि.मी. | | |
| ४. | प्रमुख जिल्हा मार्ग -५८ ते कुंभारखेडा - चिनावल - वाघोदा - निंभोरा रस्ता. | इतर जिल्हा मार्ग २३ | (०/०० ते १३/००) १३.०० कि.मी. | १३.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-७३ |
| ५. | तांदलवाडी - गाते - उदळी - रणगांव - रायपुर - दुसखेडा मार्ग. | इतर जिल्हा मार्ग-२० | (०/००ते १६/००) १६.०० कि.मी. | १६.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग ७४ |
| | **एकूण** | | | **१२४.०० कि.मी.** | |

उपरोक्त रस्त्यांपैकी १) अनुक्रम-१ या रस्त्यावरील कोचुर ते चिनावल सा.क्र. ०/०० ते ३/५०० (३.५०० कि.मी.) व खिरवड ते खानापूर सा.क्र. ३२/४०० ते ४६/६०० (१४.२०० कि.मी. ) अशी १७.७०० कि.मी. लांबी प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेच्या दोष दायित्व कालावधीमध्ये आहे.

२) अनुक्रम-२ या रस्त्यावरील कर्जोत - वाघोद - मोरगांव - नेहते सा.क्र. ११/४०० ते १६/०० (४.६०० कि.मी.) लांबी मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेमध्ये मंजूर आहे.

३) अनुक्रम-४ या रस्त्यावरील वाघोदा - निंभोरा सा.क्र. ८/८०० ते १३/०० (४.२०० कि.मी.) लांबी दोष दायित्व कालावधीमध्ये आहे.

"सदर रस्त्यांच्या उपरोल्लेखित लांबीवर संबंधीत योजनेचा कालावधी तसेच दोषदायित्व कालावधी संपल्यानंतरच सार्वजनिक बांधकाम विभागाकडून कामे करण्यात येतील." या अटीच्या अधीन राहून सदर रस्ते दर्जोन्नत करण्यात येत आहे.

परिणामी, रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील जळगांव जिल्ह्यातील **प्रमुख जिल्हा मार्ग** रस्त्यांच्या एकूण लांबीत **१२४.०० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (२५४५.७०० + १२४.००) म्हणजेच **२६६९.७०० कि.मी.** इतकी व **इतर जिल्हा मार्ग** रस्त्यांच्या एकूण लांबीत **११०.५०० कि.मी.** ने घट होवून एकूण लांबी (१८९५.६०० -११०.५००) म्हणजेच **१७८५.१०० कि.मी.** इतकी तसेच **ग्रामीण मार्ग** रस्त्यांच्या एकूण लांबीत **१३.५०० कि.मी.** ने घट होवून एकूण लांबी (६३४४.४५० - १३.५००) म्हणजेच **६३३०.९५० कि. मी.** इतकी होईल.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१८१००४१३३७०११२१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swaroop Tukaram Raipure

Digitally signed by Swaroop Tukaram Raipure
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2923930fb1a491b85ab7752c1dc4f2e3b8db33e2a8a322ed2dcfb496a3a97175, serialNumber=427875b948dcfc3f94a33993f9f923cb42f66fb0e5e2c213e8a174114e57cc46, cn=Swaroop Tukaram Raipure
Date: 2018.10.04 13:39:42 +05'30'

**( स्वरूप रायपुरे )**
उप अभियंता तथा कार्यासन अधिकारी,
महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नाशिक.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
३) जिल्हाधिकारी,जळगांव.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जळगांव.
५) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, जळगांव (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, जळगांव.
७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
८) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
९) निवडनस्ती.